कोल्हापूर मंडळाच्या अधिपत्याखालील ३० खाटांच्या ४३ ग्रामीण रुग्णालयातील १२० अस्थाई पदांना मुदतवाढ देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः अपदे-२०१५/प्र.क्र.४७/आरोग्य-४

मंत्रालय,१० वा मजला, कॉम्पलेक्स बिल्डींग,मुंबई-४०० ०३२
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.
तारीखः २९ एप्रिल, २०१५.

वाचा

१) शासन निर्णय, सा.आ.वि.,क्रमांकः पीएससी-१०९७/प्र.क्र.२६/९७/आरोग्य-४,दि.१६.०१.२००३.
२) शासन निर्णय,क्रमांकः अस्थाई-२०१०/प्र.क्र.२४/आरोग्य-४, दि.१.०२.२०१०.
३) शासन निर्णय, वित्त विभाग,क्रमांकः टीईपी-२००२/ प्र.क्र.१३/सेवा-३, दि.२१.०६.२००६.
४) शासन निर्णय, सा.आ.वि.,क्र. अपदे-२०१४/प्र.क्र.५७/आरोग्य-४, दि.२९.०३.२०१४.
५) सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र,क्र. संआसे/कक्ष-३/टे-५/जिरूसातारा/अपदे-७१/सन २०१४-१५/५१९-५२०/१५,दि.१३.०१.२०१५.

शासन निर्णय

संदर्भाधीन क्रमांक ४ येथील शासन निर्णयान्वये उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर यांच्या अधिपत्याखालील ३० खाटांच्या ४३ ग्रामीण रुग्णालयातील १२० अस्थाई पदांना दि.१.०३.२०१४ ते दि.२८.०२.२०१५ या कालावधीपर्यंतची मुदतवाढ देण्यात आलेली आहे. या पदांना दि.१.०३.२०१५ ते दि.२९.०२.२०१६ या कालावधीपर्यंत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर यांच्या अधिपत्याखालील ३० खाटांच्या ४३ ग्रामीण रुग्णालय येथील सोबतच्या विवरणपत्रातील १२० अस्थाई पदांना पुढीलप्रमाणे अटींच्या अधिन राहून दि.१.०३.२०१५ ते दि.२९.०२.२०१६ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

१) या पदांपैकी एकही पद ६ महिन्यांपेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त असल्याचे आढळून आल्यास त्याची संपुर्ण जबाबदारी संबंधित क्षेत्रिय अधिका-यांची राहील.
२) सदर पदांबाबत यापुढील मुदतवाढीचा प्रस्ताव सादर करतांना पदांच्या आढाव्याच्या संबंधी पुर्तता करण्यात याव्यात .

या पदांवरील खर्च सन २०१५-१६ या आर्थीक वर्षाच्या मागणी क्रमांक-१ मधील मुख्य लेखाशीर्ष “ २२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६- सार्वजनिक आरोग्य, ००१-संचालन व प्रशासन,

(०१) (०८)- प्राथमिक आरोग्य केंद्राचा ग्रा.रु. इतका दर्जा वाढविणे (२२१० ०४१३) " करीता मंजुर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय,क्र.असंक-१००४/ प्र.क्र.१२ ( भाग-२ )( २००४ ) /वित्तिय सुधारणा-१, दि.४.१०.२००४ प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४२९११५६११०४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay D Kamalakar

Digitally signed by Sanjay D Kamalakar
DN: CN = Sanjay D Kamalakar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.04.29 16:47:51 +05'30'

**( संजय कमलाकर )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
२. सहसंचालक, आरोग्य सेवा ( रूग्णालये-राज्यस्तर ), मुंबई.
३. उपसंचालक, आरोग्य सेवा, पुणे मंडळ, पुणे.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), पुणे.
५. सहाय्यक संचालक, आरोग्य सेवा ( लेखा व लेखापरिक्षा ), पुणे.
६. महालेखापाल, १/२,महाराष्ट्र ( लेखा व लेखा परिक्षा ) (लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई/ नागपूर.
७. जिल्हा शल्य चिकित्सक, कोल्हापूर, रत्नागिरी, सांगली, सिंधुदूर्ग.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर, रत्नागिरी, सांगली, सिंधुदूर्ग
९. सर्व वैद्यकीय अधिक्षक संबधित ग्रामीण रुग्णालये कोल्हापूर परिमंडळ.
१०. वित्त विभाग (व्यय-१३,अर्थसंकल्प-१९ ), मंत्रालय, मुंबई.
११. अवर सचिव ( सेवा-२/ सेवा-३/ सेवा-५ /अर्थसंकल्प ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
१२. निवडनस्ती ( आरोग्य- ४ ).